



# ॥सारस्वत॥

( गोंय सारस्वत समाजाचें त्रैमासिक प्रकाशन)

वर्स ४ पौष - शिगमो - १९१७ अंक ४


## एकचाराचें नवें पर्व!

सारस्वत जागृतायेचें पर्व सुरू जालां म्हणपाची गवाय हालींच्या वर्सांनी वयले वयर मेळत रावता. सारस्वतांचें मूळ पीठ आशिल्ल्या गोमंत प्रदेशांत पुर्विल्ल्या गौडपादाचार्य मठांत दोन इतिहासीक सुवाळे हालींच जाले. पयलो सुवाळो आसलो- शिष्यस्विकाराचो. मठाधीश श्रीमद् सच्चिदानंदसरस्वती स्वाम्यांनी शिष्याक संन्यास दीक्षा दिवन श्रीमद् शिवानंदसरस्वती अशें नांव दिलें. त्याच मठांत मठाधिशांचे षष्ठ्यब्दिपूर्तिचो दोळे दिपकावपी सुवाळोय जालो. ह्या दोनूय प्रसंगांचेर सारस्वत समाजाच्या विविध संप्रदायांचे प्रतिनिधी वेगळया वेगळया वाठारांतल्यान श्रीशांतादुर्गा दैवताच्या सान्निध्यांत आशिल्ल्या कवळें परिसरांत एकठांय आयले आनी समाज- संघटना अदीक घट करपाचो संकल्प करून परतले. ह्या सुवाळयाच्या निमित्त्यान श्री काशी मठ संस्थानचे शिष्यस्वामी श्रीमद् राघवेंद्रतीर्थ स्वामी आनी श्री गोकर्ण पर्तगाळ जीवोत्तम मठाचे श्रीमद् विद्याधिराजतीर्थ स्वामी कवळें मठांत पावले आनी समाजांतलो संप्रदायांमदलो भेदभाव सोपून सारस्वत समाज संघटीत जावप ही काळाची गरज आसा असो संदेश दिवन परतले.

गोंयच्या श्री गोकर्ण पर्तगाळ जीवोत्तम मठाचे मठाधीश श्रीमद् विद्याधिराजतीर्थ स्वाम्यानी दिवचलच्या व्यासाश्रसांत चातुर्मास व्रताचें आचरण केल्ल्यान मूळ प्रवाहापसून कुशीन पडिल्लो उत्तर गोंय आनी सिंधुदुर्ग जिल्ह्यांतलो सारस्वत समाज दिवचल मठांत पावलो आनी तांचे मध्य आनी दक्षिण गोंयच्या, तेच भाशेन कर्नाटक आनी मुंबय शारांत रावतल्या समाज-बांधवांकडेन स्नेहसंबंध जुळूंक पावले.

सारस्वत एकतेचे नदरेन ह्यो घडणुको उमेद वाडोवपी आसात आनी हो वावर नव्या संवत्सरांत तितलेच निष्ठेन चालू दवरपाची गरज आसा.

-संपादक

**SARASWAT**
Vol. IV- No 4







**संपादकः**
**Editor:**
चंद्रकांत केणी
Chandrakant Keni



**अक्षर-जुळणी आनी मुद्रकः**
**Typesetters & Printers:**
ओमेगा एन्टरप्राइझेस
Omega Enterprises
Vidyanagar Colony, Lane 3
Vidyanagar, Margao (Goa) 403 601



**प्रकाशकः**
**Publisher:**
रविंद्रनाथ एस. कामत
Ravindranath S. Kamat
For **Goa Saraswat Samaj**
P. O. Box No 43
Margao (Goa) 403 601

**Cover :** Shri Mahalaxmi
Mahalaxmi Devasthan Bandora- - Goa

**FOR PRIVATE CIRCULATION**

# अनुक्रम

१. युगमहर्षि श्रीइंदिराकान्ततीर्थ .....३

२. श्रीभगवंतालें गीत
**कै. वामन रघुनाथ वर्दे वालावलीकार** .....१९

३. Shree Gokarn Partagal Jeevottam Math
**P. S. Kamat** .....३३

४. श्री विजयादुर्गा देवस्थान
**विनायक नारायण शेणवी धुमे** .....४१

५. D. A. Bijoor .....४५

६. कुडाळदेशकर गौड ब्राह्मण ज्ञातीचा इतिहास,
**व्यंकटेश पा. प्रभू** .....४९

७. Biggest Natural Cave of Goa Found .....५३



**All Correspondence to be addressed to :**
Goa Saraswat Samaj, "Govinda " Bldg., Panaji (Goa) 403 001
"Saraswat" Magazine, P. O. Box No. 43, Margao (Goa) 403 602

# युगमहर्षि श्रीइंदिराकान्ततीर्थ

*श्री संस्थान गोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठाच्या परंपरेंतील विसावे मठाधीश श्रीमद् इंदिराकांततीर्थ यांची चैत्र शु।। ८मी या दिवशी ५४वी पुण्यतिथी आहे त्यानिमित्त एका युगमहर्षिंचा हा अल्प परिचय*

श्रीशके १८६४ चित्रभानु (इसवी सन १९४२) मधील चैत्र वद्य सप्तमी (मंगळवार) या दिवशीं मध्यरात्रीच्या वेळी श्री संस्थान गोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठाच्या परंपरेतील एक तेजस्वी तारा अस्तंगत झाला. तब्बल पन्नास वर्षे एखाद्या दैदिप्यमान सूर्याप्रमाणे तळपलेल्या या महर्षीच्या विद्वत्तेची व तपस्येची प्रभा आणि कठोर साधनेची दग्धता दश-दिशांत पसरविणारे मठाधीश श्रीमद् इंदिराकान्ततीर्थ श्रीपाद वडेर स्वामीजी त्या दिवशीं वृन्दावनस्थ झाले.!

एक देह लोप पावला, एक तेजस्वी व्यक्तिमत्व काळाच्या पडद्यामागें अदृश्य झालें. पण आज अर्ध्या शतकानंतरहि त्यांची स्मृति कायम आहे. त्यांच्या संपर्कांत जे आले, ज्यांनी त्यांचे दुरून किंवा जवळून दर्शन घेतले, त्यांच्या प्रासादिक वाणीचे श्रवण केलें वा त्यांचे आशीर्वाद घेण्याचे भाग्य ज्यांना लाभलें, त्यांनाच केवळ नव्हे, तर त्यांच्या अस्तानंतर जन्म घेतलेली पिढी देखील वृंदावनस्थ श्रीमद् इंदिराकांतांचें नांव ऐकतांच नतमस्तक होऊन त्यांच्या स्मृतीला अत्यादरें वंदन करते.

पांच शतकांच्या प्रदीर्घ व गौरवशाली इतिहासांत समाजाच्या व मठाच्या दृष्टीने संस्मरणीय असे अनेक टप्पे येऊन गेले. श्रीमठाचे संस्थापक श्रीमद् नारायणतीर्थ यांनी भटकळ येथे दक्षिणात्य सारस्वतांचे पहिले गुरुपीठ मन्मथ नाम संवत्सर शालिवाहन शके १३९७ मध्यें चैत्र शुक्ल द्वितियेच्या पवित्र दिवशीं स्थापन केलें. एक लहानसें रोप लावलें आणि गेल्या पांचशें वर्षांच्या काळांत, या रोपाचें एका अतिविशाल वटवृक्षांत रुपांतर झालें आहे.

या वृक्षाचें संगोपन-संवर्धन या पीठाच्या स्वामीजींच्या अखंड परंपरेने केले. या परंपरेतील प्रत्येक मठाधिशाने आपापल्या काळानुरुप समाज उर्जस्वल बनविण्याच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण कामगिरी बजावलेली असली, तरी कांही आचार्य आपल्या विद्वत्तेने व तपश्चर्येने इतके तेजस्वी बनूं शकले कीं इतिहासाचे नुसते सिंहावलोकन करावयाचें झालें तरी त्यांचीं नांवे चटकन नजरेंत भरतात. श्रीपरंपरेतील तिसरे स्वामी श्रीजीवोत्तमतीर्थ यांनी मठ व समाजासाठीं इतके अद्वितीय कार्य केलें कीं, त्यांचें नांव मठाच्या बिरुदावलींत दाखल होऊन बसलें. त्यांनीच गोकर्ण येथे मठ बांधला. सहावे गुरुवर्य श्री रामचंद्रतीर्थ यांनी पर्तगाळी येथें मठाची स्थापना केली. दरम्यानच्या काळांत इतरत्रहि अनेक मठ व उपमठ उभारण्यांत आलेले असले तरी मठाचें नांवच 'श्रीगोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठ' बनून राहिलें.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत मठाची पताका उंच व दूरवर फडकावण्याचें कार्य श्रीपरंपरेतील अठरावे स्वामी श्रीमद् पूर्णप्रज्ञतीर्थ स्वामी यांनी केले. जवळजवळ पन्नास वर्षे गुरुपीठावर राहून मध्वमताचा व्यापक प्रसार केलेले ते आचार्य विद्वान व विरक्त म्हणून प्रसिद्ध होते. विद्यादान व समाजहिताचीं कार्ये यांत त्यांना विशेष आस्था. भारतभर झंझावती भ्रमण करून त्यांनी सभा गाजविल्या. वादविवादांत ते अजिंक्य राहिले आणि श्रीसंस्थानच्या कीर्तीत त्यांनी अभूतपूर्व भर घातली.

त्यानंतर पीठावर आलेले श्रीपद्मनाभतीर्थ यांचे शिष्य श्रीमद् इंदिराकांततीर्थ यांची कारकीर्द हें पर्तगाळी मठाच्या इतिहासांतील सुवर्णपर्व मानलें जातें.

### जन्म व बालपण

श्रीमद् इंदिराकांततीर्थ हे भटकळ येथील श्रीलक्ष्मीनरसिंह देवस्थानांतील अर्चक, वेदशास्त्रसंपन्न नरसिंहबाब

पुराणिक यांचे तृतीय चिरंजीव. रामकृष्ण हें त्यांचे कौटुंबिक नांव. भटकळ येथील पुराणिक घराणें हें विद्वानांचें घराणे म्हणून सुपरिचित होते. या भारद्वाज-गोत्री कुटुंबांतील रामकृष्णाचा जन्म श्रीशके १७९३ या प्रजापति संवत्सरांत माघ शुद्ध ७ मी च्या दिवशीं झाला. तो गुरुवार होता.

लहान वयांतच रामकृष्णाची तीव्र बुद्धिमत्ता, त्याचा करारी स्वभाव व चौकस वृत्ति परिसरांतील लोकांच्या नजरेंत भरली. घरांतील वातावरण अत्यंत सात्त्विक असल्याने मुलांच्या कानावर नित्यशः संस्कृत श्लोक व स्तोत्रें पडत. चिमुकल्या रामकृष्णाने वडिलधाऱ्या मंडळीच्या तोंडून शुद्ध उच्चारांतील श्लोकांचे श्रवण केलें आणि अनेक क्लिष्ट श्लोक देखील मुखोद्गत करून घेतले.

श्रीसंस्थान गोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठाचे १९वे पीठाधीश श्रीमद् पद्मनाभतीर्थ श्रीपाद वडेर स्वामीजींना श्रीमठाची परंपरा चालविण्यास पुराणिक घराण्यांतील हा मुलगा अनुरुप आहे असे वाटल्यास आश्चर्य नाहीं. पूर्वाश्रमीं सदर बटु हा श्रीस्वामीजींचा भाचा असल्याने त्यानी बटूची निवड करतांच कुटुंबियांच्या संमतीने रामकृष्णाला पर्तगाळी मठांत आणवून व्ययनाम संवत्सरांत श्रीशके १८०८ मधील वैशाख शु. दशमीला श्रीसीतारामदेव सन्निधींत, कुशावती नदीवर सुमुहूर्ती उत्तम लग्नावर संन्यास पद्धतियुक्त शिष्याश्रम देऊन श्रीमद् इंदिराकांततीर्थ हें अभिदान प्रकट केलें.

सहा वर्षे, एक महिना आणि सत्तावीस दिवस श्रीमद्इंदिराकांततीर्थांनी शिष्यत्व भोगलें. या कालावधींत कर्नाटकांतील एका प्रख्यात पंडिताच्या मार्गदर्शनाखालीं त्यांनी दीक्षोत्तर अध्ययन घेतलें. त्यांचे गुरु आपल्या शिष्याच्या अध्ययनाकडे स्वतः विशेष लक्ष पुरवीत. दहा उपनिषदे, सहा वेदांगे, षड्दर्शनें, स्मृति पुराणें, याशिवाय व्याकरण, न्याय, मीमांसा, अलंकार, वेदांत वगैरे विषयांत ते इतके पारंगत झाले कीं, त्यांची ग्रहणशक्ति व कुशाग्र बुद्धि तत्कालिन पंडितांना अवाक् करून बसली.

### श्रीगुरूपीठारोहण

गुरू वृंदावनस्थ झाल्यानंतर पीठाधिकार हातीं आले आणि श्रीमद् इंदिराकांततीर्थांनी दिग्विजयार्थ संचार करून शिष्यांना दर्शन दिलें, समाजाची पहाणी करून त्याला नवे वळण घातले, आचारांतील शिथिलता काढून धर्मशास्त्राच्या बंधनाचा योग्य मान राखण्याचा आग्रह धरला. माध्वमताप्रमाणे व्रतवैकल्ये, आचार-विचार, इतकेच नव्हे तर वेष-मुद्रा, जप-जाप्य ह्या बाबतीत स्पष्ट दंडक ठरवून दिले. वैष्णव संप्रदायाला साजेल अशी समाजातील प्रत्येकाची वागणूक रहावी, असा आग्रह धरला. उपदेश करून, बदललेल्या परिस्थितीची जाणीव करून घेऊन आणि प्रसंगी आपले अधिकार चालवून समाजाचे स्वरुपच बदलून टाकलें.

श्रीमद् इंदिराकांततीर्थ गुरुपीठावर १३ जुलै १८९२ (नंदन सं. आषाढ वद्य तृतीया, शके १८१४) आरुढ झाले. १९ वे शतक संपू घातले होते आणि भोवतालचे वातावरणही बदलू लागले होते. इतिहास एक पर्व पूर्ण करून दुसऱ्या पर्वांत दाखल व्हायच्या संधिकाळावर श्रीइंदिराकांततीर्थांची कारकीर्द सुरु झाली आणि अनेक सामाजिक संघर्ष, राजकीय उलाढाली व कसोटीचे क्षण यांनी भरलेले अर्धे शतकभर ते पीठावर राहिले. समाजाचे विसाव्या शतकांत नेतृत्व करण्याशिवाय नव्या शतकांतील पूर्वार्धांत उपस्थित झालेले अनेकविध प्रश्न समर्थपणे हाताळून त्यांनी गुंते सोडविले व समाजाला नैतिक दृष्ट्या उन्नत, सामाजिक दृष्ट्या संघटित व आर्थिक दृष्ट्या समृद्ध अवस्थेंत पोहोचवून मठाच्या इतिहासांतील एक सुवर्णपर्व घडविलें.

श्रीमद् इंदिराकांततीर्थांच्या कारकिर्दीची दोन ठळक वैशिष्ट्यें होतीं. पहिले वैशिष्ट्य म्हणजे समाजाचे घटक जेथे जेथे विखुरलेले होते, तेथे तेथे संचार करून त्यांच्याशी संपर्क साधण्याचा आग्रह आणि संधि मिळेल तेथें बौद्धिके व प्रवचनाद्वारें समाज प्रबोधन करण्याचें व्रत हीं तीं वैशिष्ट्यें होत.

आपल्या शिष्याची मधुरवाणी, प्रभावी वक्तृत्व शैली व अवघड नि गुंतागुंतीचा विषय सुलभ भाषेंत समजावण्याची हातोटी श्रीपद्मनाभतीर्थाना माहीत होती, म्हणून आपल्या कारकिर्दीत देखील शिष्य-स्वामींची प्रवचनें ते घडवून आणीत आणि स्वतः अशा प्रवचनांच्यावेळी एक श्रोते होऊन तीं कौतुकाने ऐकत!

पुराणिक घराण्यामध्यें प्रवचनकारांची एक उज्वल परंपराच होती. पण ज्यावेळीं पीठाधीश या नात्याने

श्रीमद् इंदिराकांततीर्थ यांचे भटकळ येथें आगमन झालें, तेव्हा त्यांच्या पुराणश्रवणाला अलोट गर्दी जमूं लागली. श्रोत्यांमध्यें त्यांचे पूर्वाश्रमींचे वडीलही असायचे. प्रवचन सुरू झालें आणि साक्षात् सरस्वतीचा शांत-संथ, निर्मळ व मधुर वाक्‌प्रवाह श्रोत्यांच्या कानीं पडूं लागला. 'सारे मंत्रमुग्ध झाले आणि हें श्रवण कधींच संपूं नये असे त्यांना वाटूं लागलें. स्वामीजींची वाणी एकून वडिलांनाहि कृतार्थता वाटली व त्यांच्या डोळयांतून अश्रू ओघळूं लागले.

श्रीइंदिराकांतांच्या प्रवचनाचे हेतू स्पष्ट होते. आपल्या विद्वत्तेचे प्रदर्शन करण्याचा विचार दूरान्वयाने देखील त्यांच्या मनाला स्पर्शत नसे. ज्या संधिकालांत सुधारणा व शिक्षणाच्या नांवाने समाज धर्मभ्रष्ट, कर्मभ्रष्ट व नीतिभ्रष्ट होत चालला आहे, त्या समाजाला आपल्या सांस्कृतिक वारशाचे, उदात्त मूल्यांचें, पुरातन ऊर्जस्वल परंपरेचे भान करून देणें हा होता.

नव्या युगानुरुप चालीरीती बदलल्या पाहिजेत, रुढी-समज यांना नवी दिशा मिळाली पाहिजे; पण त्याचबरोबर हीं स्थित्यंतरें पचवून समाज अभंग ठेवाव-याचा झाला तर त्यासाठी समाजामध्यें स्थैर्य राहिलेंच पाहिजे या जाणिवेंतून ते प्रवचन करीत.

## नव्या युगाचे वारे

विसाव्या शतकाच्या आरंभीं साऱ्या जगांत प्रचंड उलथापालथ घडून आली आणि त्याचे पडसाद सारस्वत समाजांतहि उमटूं लागले. आंग्लविद्याविभूषित नवे नेतृत्व समाजाला लाभलें होतें आणि त्या नेतृत्वाने पुरस्कारिलेल्या सुधारणा कार्यक्रमाना नव्या पिढीकडून उत्स्फूर्त प्रतिसाद मिळत असतानाच परंपरावादी लोकांचा विरोध व्हायचा. या संघर्षातून सामाजिक ऐक्य व सख्य नष्ट होईल, याची कल्पना श्रीमद् इंदिराकांततीर्थांच्या दिव्य दृष्टीला चटकन आली. नवे विचार अवश्य यावे आणि समाजाने जीर्ण, कालबाह्य गोष्टींचा त्यागहि करावा; पण त्याच बरोबर समाजाचें निराळें अस्तित्व टिकवून ठेवले पाहिजे. धर्मशास्त्राचे नव्याने मूल्यमापन होणे जरुरीचे आहे असें त्यांना वाटू लागले. स्वामीजी केवळ विचार मांडून स्वस्थ बसले नाहींत, तर नव्या विचारांचे आचरण करून त्यांनी समाजाला नव्या बदलांना तोंड देण्यासाठी समर्थ बनविलें.

सामाजिक स्थित्यंतरां बरोबर समाजांत अनेक प्रश्नांवर वादळें माजत राहिलीं. एका आचार्याच्या कार्य-काळांत इतकी प्रचंड व एकामागून एक अशीं वादळें पांचशे वर्षांच्या इतिहासांत कधींच आली नव्हती. कांही प्रश्न इतके गुंतागुंतीचे होते कीं नव्या युगांत नवी धोरणे स्वीकारण्याची आवश्यकता भासली तरी कट्टरपंथी लोकांचे समाधान करण्यासाठी धर्मशास्त्राचा आधार चटकन सांपडत नव्हता. आणि विशेष म्हणजे प्रत्येक प्रश्नावर समाजांत दोन अथवा त्याहून अधिक तट पडल्यामुळें न्यायनीति आणि तर्काच्या आधारे प्रश्न हाताळणें शक्य असले तरी तसा प्रयत्न केल्यामुळें समाज दुभंगण्याचा धोका निर्माण झाला होता. हे सारे प्रश्न सोडवताना श्रीमद् इंदिराकांततीर्थांनी अपार सहनशीलता दाखवली. ज्या कौशल्याने त्यांनी प्रतिस्पर्धी गटांना एक-मतावर आणलें आणि प्रश्न सोडवून समाज अभंग ठेवला त्याला इतिहासांत तोड नसावी.

सामाजिक परिवर्तनाबरोबर नवे नवे विचार पुढें येत होते आणि प्रस्थापित कल्पनांना जबरदस्त धक्के बसत होते. समाजांत निर्माण झालेले धर्म-मालिन्य थोड्याफार प्रमाणात वातावरण अधिक गढूळ करीत होते. यांतून मार्ग काढण्याचा एकमेव उपाय म्हणजे लोकहृदयांतील सत्व व स्वाभिमानाची, धर्म व नैतिकतेची मंदावलेली ज्योत पुन्हा प्रज्वलित करणे होय, असें आचार्यांच्या मनाने घेतलें आणि जनसंपर्काचा एक विस्तृत कार्यक्रम त्यांनी आंखला.

ज्या काळांत आचार्य गुरुपीठावर आले, त्यावेळीं मर्यादित भागांत रेल्वे-वाहतूक सुरु झाली होती. इतरत्र प्रवासाचीं साधने म्हणजे- घोडे व पदयात्रा हींच होतीं. तरीही पन्नास वर्षांच्या कालावधींत श्रीमद् इंदिराकांत-तीर्थांनी पंचवीस दिग्विजय केले आणि समाजाचे घटक जेथे जेथे विखुरले होते तेथें तेथे जाऊन स्थानिक पातळीवर समाज संघटित केला. पहिली यात्रा ते पीठा-धिष्ठित झाले त्याच वर्षी घडून आली. पंचविसावा दिग्विजय श्रीस्वामीजी वृन्दावनस्थ होण्यापूर्वी सहा महिने अगोदर झाला. धर्मसंस्था व धार्मिक भावनेला आलेलें मालिन्य दूर करून धर्माचें तेज पुनःप्रज्वलित करण्यासाठी केलेल्या या यात्रा म्हणजे एक प्रकारचा

धर्मयज्ञच होता. संचारांत जवळ व दूर विखुरलेल्या समाजाशीं संपर्क साधून संवाद करावा आणि विविध घटकांचा आपसांत व मठाशीं सुसंवाद प्रस्थापित करावा हें त्यांचें ध्येय होतें. इतर वेळीं अधिकांश काळ त्यांनी पर्तगाळी मठांत वास्तव्य केलें. पण मठांत असताना देखील स्वामीजीना सामाजिक कैफियती व गाऱ्हाणी ऐकून सुयोग्य निवाडा द्यावा लागे. अशी चर्चा मोठी मार्मिक व्हायची. एक प्रकारे स्वामीजींचा सत्संग हा एक वाक्‌यज्ञ असायचा.

समाजांतील धर्म-औदासिन्य दूर करून समाज कार्यप्रवण करण्यासाठींच स्वामीजींनी संचार केले असे नव्हे, त्यांनी आसेतु हिमाचल या पुरातन देशांतील तीर्थस्थानांच्या यात्राहि केल्या. परंतु अधिकांश यात्रा या समाजरूपी तीर्थक्षेत्रांच्याच होत्या. अशा यात्रांमध्यें ते गोव्याच्या उत्तरेला व दक्षिणेला मुंबईपासून कन्याकुमारी पर्यंत सर्वत्र गेले व प्रमुख ठिकाणीं मुक्काम करून समाज-जागृतीचें महत्त्वपूर्ण कार्य केले. या संचारामुळे आणि स्वामीजींच्या मार्गदर्शनामुळें समाजाचे स्वत्व व स्वाभिमान जागृत होऊन परंपरेशीं संघर्षाचा दुरावा येऊ न देतां, नव्या युगाचीं आव्हानें पेलण्यासाठीं सज्ज झाला.

पश्चिम व दक्षिण भारतांतील विविध तीर्थस्थानांची यात्रा तर स्वामीजींनी केलीच. शिवाय घाट माथ्यावर कोल्हापूर, पंढरपूर आदि तीर्थांचे दर्शन घेऊन उत्तर भारतांत मथुरा, वृंदावन, प्रयाग, काशी, अयोध्येपासून हरद्वार, ह्रषिकेश व बद्रिनाथ पर्यंत त्यांनी पायीं भ्रमण करून सर्व तीर्थस्थानांना भेटी दिल्या. मध्य भारतांत क्षिप्रा, उज्जयनी, गोमती; पूर्व भारतांतील जगन्नाथपुरी आणि काठेवाड भागांत गिरनार, सोमनाथ, द्वारका या तीर्थस्थानीं जाऊन स्वामीजींनी त्यांचें महत्त्व समजून घेतलें व पुण्य-संचय केला. तो पर्यंत श्री मठपरंपरेतील दुसऱ्या कोणत्याच आचार्यांनी इतके व्यापक भ्रमण केले नव्हते. अलिकडे श्रीमठ परंपरेतील विद्यमान गुरुस्वामी श्रीमद् विद्याधिराजतीर्थ यांनी हा विक्रम मोडण्याचे श्रेय मिळविलें. आधुनिक प्रवास साधने उपलब्ध असल्यामुळें आज आसेतु हिमालय भारत यात्रा करणे सुलभ झाल्याने अशा प्रत्येक यात्रेंत मठानुयायी वर्गालाहि त्यांनी सहभागी करवून घेतलें.

## शिष्यस्वीकार

श्री शके १८१४ सालीं इंदिराकांततीर्थांनी पीठाधिकार ग्रहण केल्यानंतर फक्त चार वर्षांनी त्यांनी शिष्यस्वीकार केला. स्वामीजी कर्नाटकांत संचारासाठी गेलेवेळी शिष्यस्वीकार करायचें ठरलें आणि बटूचा शोध सुरू झाला. चिक्कनकोड येथील सच्छिल पंडित घराण्यांतील नारायण आचार्य यांचा चौदा वर्षांचा सुपुत्र व्यास याची निवड करण्यांत आली- आणि बटूच्या वडिलांकडे बटूची मागणी करण्यांत आली. ती मान्य होऊन बटूला स्वामीजींच्या हवालीं करण्यांत आले. स्वामीजींच्या मनांत त्याच्या विषयीं अपार प्रेम निर्माण झालें. बटू श्री इंदिराकांत स्वामीं प्रमाणेच कांतिमान, तेजस्वी, गव्हाळ वर्णाचा होता. शिवाय आजानुबाहु पुढच्या संचारांत स्वामीजींनी त्याला आपल्या बरोबरच नेले आणि मठानुयायांशी सल्लामसलत करून शके १८१८ च्या वैशाख पौर्णिमेला त्याला गोकर्ण येथील मठीं संन्यासदीक्षा दिली. मोठ्या आवडीने बटूचें श्रीनरहरीतीर्थ असें नामकरण करण्यांत आलें. दीक्षा समारंभानंतर श्रीक्षेत्र रामेश्वर पर्यन्त दिग्विजय पूर्ण करून स्वामीजी पर्तगाळ मठीं नवशिष्यासह परत आले.

संचारांत असतानाच श्रीइंदिराकांत स्वामीजींनी शिष्याच्या अध्ययनाची व्यवस्था केली होती. चांचणी घेऊन नियुक्त केलेल्या पंडिताप्रमाणें स्वामीजीही त्याना विचारधारा, आचारसंहिता आणि कार्यप्रणालीचे पाठ देत होते. पर्तगाळ मठीं परतल्यानंतर स्वामीजी त्याच्या अध्ययनाकडे विशेष लक्ष पुरवूं लागले. स्वामीजी आणि मठानुयायी आनंदांत होते. पण हा आनंद नियतीला पाहवला नाही. सुमारे दीड वर्षांच्या ह्या आनंदी वातावरणानंतर मठावर शोककळा पसरली. अल्प आजाराचें निमित्त होऊन अकस्मात शके १८१९ च्या मार्गशीर्ष वद्य षष्ठी रोजी, श्रीनरहरीतीर्थांना देहमुक्ति प्राप्त झाली आणि स्वामीजींवर आकाशच कोसळल्या सारखें झालें. त्या दीड वर्षाच्या काळांत श्रीनरहरीतीर्थांच्या प्रगल्भ बुद्धिमत्तेचा स्वामीजींना वेळोवेळीं प्रत्यय आला होता. त्यांच्या भविष्यकाळांतील कर्तृत्वाची अनेक स्वप्ने पाहिलीं होतीं. परंतु अकस्मात हा दुर्धर प्रसंग स्वामीजींवर ओढवला. आचार्यांच्या मनाला ही घटना कायमची लागून राहिली. बाह्य जगाला जरी त्यांनी आपलें दुःख

दिसूं दिलें नाही, तरी सर्वसंगपरित्याग केलेल्या त्या थोर महात्म्याला या घटनेने जी आंतरिक वेदना दिली, त्या पायीं त्यांनी भोजन सोडून दिलें. फलाहार करून ते पुढील आयुष्य जगले. केवढा हा वज्र निर्धार!

### द्वितीय शिष्यस्वीकृति

अशीं दहा वर्षे गेलीं. स्वामीजी मठाचा कारभार कर्तव्यबुद्धीने पहात होते. संचार करून अनुयायांना मार्गदर्शनहि करीत. परंतु त्यांचें मन उद्विग्नच राहिलें. याच मनःस्थितींत स्वामीनी नव्या शिष्याचा स्वीकार केला. पर्तगाळी येथील आचार्य घराण्यांतील नारायण नामक बटूला संन्यासदीक्षा देऊन श्रीकमलानाथतीर्थ असे नामाभिधान दिले आणि त्याच्या अध्ययनाची सर्व व्यवस्था केली. पुढच्या काळांत मठाचा सर्व कारभार श्रीइंदिराकांत स्वामीजींनी श्रीकमलानाथतीर्थांवरच सोंपविला आणि स्वतः परमात्म्याचें चिंतन आणि मठानुयायांना मार्गदर्शन करीत राहिले. क्वचित प्रसंगी मठाचे महत्त्वाचे निर्णय त्यानी घेतले असतील.

### काशीचें अन्नछत्र

श्रीइंदिराकांततीर्थाचे परमगुरु श्रीपूर्णप्रज्ञतीर्थ यांनी काशी यात्रेला गेल्यावेळीं काशीनरेशांकडे ठेवीच्या रुपाने रु. ६०००/- ठेवून त्यांतून नित्य अन्नसंतर्पण चालावें अशी व्यवस्था केली होती. पुढें अन्नसंतर्पण बंद पडले. पूर्व स्वामीजींनी काशी नरेशाशी पुष्कळ पत्रव्यवहार केला होता. परंतु तें काम मार्गी लागले नाहीं. श्रीइंदिराकांततीर्थांनी हें प्रकरण धसास लावलें. बेळगांव येथील एक सद्गृहस्थ श्री गोपाळ व्यंकोजी खोत हे काशी शहरांत व्यापार उदीम करीत होते. त्यांजकडे काशीराजासाठीं पत्र आणि पैसे वसूल करण्याचें मुखत्यार पत्रहि स्वामीजींनी दिलें आणि ही रक्कम सव्याज वसूल केली.

### डिचोली मठ

गोमंतकांतील डिचोली ग्रामी श्रीअणुजीवोत्तम तीर्थ वृन्दावनस्थ झाले होते. त्या जागी मठ बांधण्याचें काम श्रीमद् इंदिराकान्ततीर्थांनी हातीं घेतलें. सदर मठासाठी जागा कारापूर येथील शेणवी बोरकर कुटुंबियांनी संस्थानला दिली होती. शके १८२७ सालांतील ज्येष्ठांत मठाची बांधणी पूर्ण होऊन ज्येष्ठ शुक्ल त्रयोदशी दिनीं मठांत श्रीलक्ष्मीनारायण व श्रीरामदेव यांची प्रतिष्ठापना करण्यांत आली आणि दैवतांची पूजाअर्चा आणि नैवेद्य यांसाठी आवश्यक ती तरतूद स्वामीजींनी केली.

### समाज परिवर्तनाचा काळ

तो समाज परिवर्तनाचा काळ होता. ह्या परिवर्तनास अनुसरून अनेक प्रश्न निर्माण झाले. तसेच इतर अनेक प्रकारच्या गुंतागुंतीहि निर्माण झाल्या. जुन्या नव्याचे झगडे तसे नेहमीच होतात. परंतु ह्या काळांत ते अधिक तीव्रतेने उफाळून आले. श्रीइंदिराकांत स्वामीजींनी समयसुचकता दाखवून आणि उपजत बुद्धिमत्ता वापरून या समस्यांना तोंड दिलें.

श्रीमद् इंदिराकांततीर्थांनी पीठाधिकार ग्रहण केला त्यावेळीं गोमंतकांत धूपकर प्रकरण निर्माण झालें होतें आणि तें गाजतहि होते. माशेल गांवांत वासुदेव भट धुपकर हे विद्वान द्रविड ब्राह्मण राहत होते. कीर्तन-प्रवचन करणें हा त्यांचा व्यवसाय. त्यांच्या चुलत बंधूची कांहीं स्मार्त सारस्वतांशी बोलाचाली होऊन प्रकरण विकोपाला गेले. आणि याचा परिणाम म्हणून सारस्वत घराण्यांनी धुपकरांशीं व्यवहार बंद केला. कांहीं दिवस गेल्यानंतर कटुता किंचित दूर झाली आणि धुपकरांना पूजा अर्चा यांसाठी सारस्वत पुन्हा आमंत्रित करूं लागले. पणजींतील म्हामाय कामत घराण्याने धुपकरांना आपल्या अनंतव्रतोत्सवास कीर्तन करण्यासाठीं आमंत्रण दिलें आणि समाजांत तेढ निर्माण झाली. श्रीशके १८१७ मध्यें हें प्रकरण स्वामीजीपर्यंत गेलें. स्वामीजींनी उभय पक्षांची समजूत घालून प्रकरण मिटवून टाकलें.

यानंतरचें दुसरें प्रकरण म्हणजे बारदेसकर बहिष्कार प्रकरण होय. शके १८२२च्या सुमारास उद्भवलेलें हें प्रकरणहि क्षुल्लक कारणांतून, किंबहुना हेव्यादाव्यांतून उद्भवलेलें. परंतु त्यामुळें सारस्वतांत दुही पडण्याची वेळ आली होती. त्याचे दुष्परिणाम मुख्यत्वें बारदेसकर कुटुंबांना भोगावे लागत होते. समाजाचें प्रकरण म्हणजे शेवटी स्वामीजीकडेच यायचें. हें ही प्रकरण श्रीइंदिराकांततीर्थांकडे आलें. पर्तगाळी येथें उभय पक्षांची बैठक

भरली व बरीच भवति न भवती झाली. अखेर उभय पक्षांत पूर्ववत मैत्री घडवून आणण्यांत श्रीस्वामीजींना यश मिळालें.

## परदेश गमन

ह्या पुढचें एक महत्त्वाचें प्रकरण म्हणजे परदेश गमन. परदेशगमनाला धर्मशास्त्राची मान्यता नाहीं, असे त्याकाळीं मानले जायचें. भारताचा किनारा ओलांडणारी व्यक्ति बहिष्कृत झाली असें त्याकाळीं समाज मानीत असे. शिरसीचे एक गृहस्थ श्री. पुंडलीक नारायण कामत वकील झाले आणि उच्च शिक्षणासाठीं परदेशीं जाऊन इ. स. १९०३च्या सुमारास परतले. स्थानिक सारस्वत समाजाने त्यांना बहिष्कृत केले. हा प्रश्न उत्तर कन्नड जिल्ह्यांत खळबळ माजवून बसला आणि समाज प्रतिनिधींनी आपलीं गाऱ्हाणीं स्वामीजींकडे नेलीं.

श्रीमद् इंदिराकांत स्वामीजींच्या द्रष्ट्या नजरेने पुढील शक्यतांचा अंदाज घेतला. यापुढील काळांत परदेशगमना शिवाय समाज नव्या युगांतील स्पर्धांमध्यें टिकाव धरूं शकणार नाही हें त्यांनी ओळखलें; परंतु धर्मगुरूना समाजाच्या मताचीहि कदर करणे भाग होते. त्यांनी एकंदर प्रश्नाचा सांगोपांग विचार करून दोन्ही पक्षांना न दुखवितां सुवर्ण मध्य साधला. श्री. पुंडलिक कामत यांस काशीक्षेत्रीं यात्रा करावयास लावून प्रायश्चिताने त्यांची दोषांतून मुक्तता केली.

हळुहळू परदेश गमनाचा प्रश्न हा समाजाच्या दृष्टीने कसोटीचा प्रश्न बनत राहिला. पुरुषार्थाचीं नवीं क्षितिजें काबीज करावयाचीं झाली तर समुद्रयात्रा अपरिहार्यपणे करावीं लागेल आणि शास्त्र नियमांना अनुसरून समुद्रयात्रा निषिद्ध मानली तर नव्या युगांतील विकासाची दारे समाजासाठी कायमचीं बंद राहतील, या पेंचातून मार्ग कसा निघतो याची सर्वांनाच चिंता लागून राहिली होती.

इ. स. १९१० च्या सुमारास गोमंतकांतील कैवल्य मठाचे एक अनुयायी पोर्तुगालला जाऊन पोर्तुगीज न्यायालयांतील एक प्रमुख न्यायाधीश बनून आले. सारस्वत समाजांतील ते पहिलेच न्यायाधीश असल्याने समाजाला त्यांच्याबद्दल रास्त अभिमान वाटत होता. खुद्द त्यांना देखील आपल्या कुलपरंपरेबद्दल अतीव आदर होता. ते परतल्यावर समाजाने त्यांचा स्वीकार करावा कीं काय असा वाद निर्माण झाला आणि जेव्हा वाद विकोपाला जाऊं लागला तेव्हां या वादावर श्री इंदिराकांततीर्थांनी जो तर्कशुद्ध व नव्या युगाला अनुरुप असा शुध्दि व प्रायश्चिताचा तोडगा शोधून काढला, त्यामुळें सारस्वत समाजासाठीं विदेशाचीं दारें सताड उघडीं झालीं आणि बुद्धिमत्तेच्या जोरावर या समाजांतील नररत्नें आंतरराष्ट्रीय ख्याति मिळवूं शकलीं.

सामाजिक ऐक्यासाठीं केलेल्या डोळस प्रस्नांमुळें समाजांतील विविध संप्रदायांमध्ये एकता प्रस्थापित झाली आणि समुद्रयात्रेला सशर्त धर्ममान्यता मिळाल्याने समाजांतील कर्तबगार तरुणांसाठी देशविदेशांतील विविध क्षेत्रांची कवाडें खुली झालीं. तरी बदलत्या काळाबरोबर नवे नवे प्रश्न उपस्थित होतच राहिले. मुलींच्या लग्नाचें वय हा श्री इंदिराकांततीर्थांच्या कारकीर्दीत समाजाला अस्वस्थ बनविणारा एक प्रश्न ठरला. १९०१ च्या सुमारास या प्रश्नावर मठाधीशांनी स्पष्ट आदेश द्यावा असे विनंती अर्ज श्रीमठांत येऊं लागले. प्रश्न सर्वस्वी समाजाचा होता आणि दोन कुटुंबांच्या संबंधांचा होता. कांहीं घरांतील मुलींचीं वयें वाढून उशिरां लग्ने होऊ लागलीं तेव्हां स्वामीजीं कडे तक्रारी येऊं लागल्या. कर्मठ लोक 'अष्टवर्षा भवेत् कन्या, नववर्षा तु रोहिणी, दशवर्षा भवेत गौरी, अतुर्ध्वं रजस्वला' या शास्त्रवचनाला अनुसरून मुलीला दहा वर्षे झाल्यावर तिचें लग्न धर्मशास्त्राला मान्य नाही असे प्रतिपादूं लागले. प्रश्न नाजूक होता. स्वामीजींनी समाज प्रतिनिधींशी विचार विनिमय करून लोकमत अजमावलें आणि बदलत्या काळाच्या खुणा ओळखून समाजाने समंजसपणे हा प्रश्न सोडवावा असा सूज्ञ सल्ला दिला. या सल्ल्याचा अपेक्षित परिणाम झाला. जे प्रश्न मठाधीशांनी हाताळावयाचे तेवढेच त्यांच्याकडे न्यावेत आणि इतर प्रश्न समाजाने परिस्थितीचे भान ठेवून सोडविण्यांत प्रत्यवाय नाहीं असा अलिखित नियम रूढ झाला.

## एकी-बेकीचा तंटा

पोर्तुगालमध्यें १९१० सालीं प्रजासत्ताकाचा उदय होतांच गोव्यांतील हिन्दूंचे दबलेले आवाज व्यक्त होऊं लागले. अशा वेळीं सारस्वत समाजांतील विविध संप्रदायांमध्यें कोण श्रेष्ठ व कोण कनिष्ठ याबद्दल वाद माजले.

भविष्यकाळाचा वेध घेण्याची दृष्टि असलेल्या कांही विचारवंतांनी सारस्वत एकतेच्या दृष्टीने हा वाद तत्काळ मिटविण्याची आवश्यकता प्रतिपादून गोव्याबाहेर त्या दृष्टीने तोवर जे प्रयत्न झाले होते त्यांचे समर्थन करण्यास सुरुवात केली.

## विविध संप्रदाय

१९०७ सालीं मंगळूर शहरांत विविध संप्रदायांना एकत्र आणण्याच्या दृष्टीने एक परिषद झाली होती. तो एक अल्पारंभ ठरला. परंतु पुढच्या वर्षी मुंबईला दुसरी परिषद भरली व तिचे पडसाद संपूर्ण किनारपट्टीवर विखुरलेल्या सारस्वत समाजांत उमटले. समाजांतील भिन्नभिन्न संप्रदाय व पोटजातींचे एकीकरण होऊन त्यांच्यांत अनिर्बंध रोटीबेटी व्यवहार व्हावा अशी शिफारस या परिषदेने केली. अर्थात या ठरावाला विरोध करणारे लोक होतेच.

१९१० सालीं तिसरी परिषद बेळगांव येथे भरली आणि एकीचा ठराव त्या परिषदेने संमत करून सर्व पोटजातींच्या प्रतिनिधींच्या सहभोजनाचा कार्यक्रमहि घडवून आणला.

या पार्श्वभूमीवर गोव्यांत एकता परिषद आयोजित करण्यांत आली असतां तिला विरोध करणारे स्थानिक लोक निघाले. परिणाम असा झाला कीं २९ ते ३१ डिसेंबर १९१० असे तीन दिवस एकता समर्थकांनी म्हापशांत तर बेकीवाल्यांनी कवळें येथें समांतर परिषदा घेतल्या. या परिषदांमुळें एकता दूरच राहिली, कटुता मात्र उदंड निर्माण झाली. प्रतिस्पर्धी लोकांच्या विरुद्ध अपप्रचार व बहिष्कार याचें सत्र सुरू झालें. इतकेंच नव्हे तर बेळगांव येथें सहभोजनात सामील झालेल्यांना ज्ञातीतून बहिष्कृत करावे असें समाजांतील मातब्बर मंडळीकडून श्रीइंदिराकांततीर्थांवर दडपण येऊं लागलें.

बेकी समर्थकांना शांत करण्याचा श्री स्वामीजीनी प्रयत्न केला असतां एकी समर्थक रुष्ट झाले आणि त्यांनी पर्तगाळी मठांत जाऊन आपली बाजू त्यांच्या समोर मांडली. श्रीमद् इंदिराकांततीर्थांनी दोन्ही बाजू शांतपणे ऐकून घेतल्या व म्हटलें, "जुन्या परंपरेला चिकटून राहणारे त्यांच्या पुरते जसे प्रामाणिक आहेत, त्याचप्रमाणे व्यापक समाजहिताचा विचार करून समन्वयाचा पुरस्कार करणारे देखील समाजहिताची तळमळ बाळगणारे आहेत. हा प्रश्न एकाच पीठाच्या कक्षेंतील नसल्याने या प्रश्नावर सारस्वत समाजाच्या इतर पीठांना विश्वासांत घेऊन समन्वय घडवून आणला पाहिजे." आणि त्या दृष्टीने स्वामीजी कार्यरत झाले. या प्रयत्नामुळेच दहा वीस वर्षाच्या कलावधींत समाजांत अभूतपूर्ण एकात्मता घडून येऊं शकली.

## भिन्न पीठांमध्यें सख्य

सारस्वत समाजामध्यें भिन्न भिन्न गुरुपीठें असलीं तरी सर्व पीठांचा हेतु समाजांतील धार्मिकता व अध्यात्मिकता वृद्धिंगत करून समाज नीतिमान, पुरूषार्थी, कर्तव्यदक्ष व समृद्ध बनविणें हाच आहे. परंतु जोपर्यंत भिन्न भिन्न पीठांचे स्वामी एकत्र येऊन आपसांत स्नेहसलोखा वद्धिंगत करणार नाहींत, तोपर्यंत भेदभावाचीं काटेरी कुंपणे अधून मधून कलहास कारणीभूत ठरतील याची कल्पना श्रीमद् इंदिराकांततीर्थांच्या दिव्य दृष्टीला आली नसती तरच नवल ठरले असते. विविध मठांमध्यें स्नेह-सलोखा राहिला तर समाजांतील विविध संप्रदाय व समाजांतील पोटजातींमध्यें सख्य व एकता घडून येईल असें ते मानीत. त्याकाळीं सारस्वतांमध्यें किमान नऊ ठळक पोटजाती होत्या. काहीं पोटजाति गौड सारस्वत समाजाशीं आपले कोणतेच संबंध नाहींत असा दावा करीत होत्या. प्रथम कैवल्य, काशी व गोकर्णमठ मध्ये एकता घडून आली तर हळुहळू इतर मठांशीं सख्य प्रस्थापित करणें अवघड जाणार नाहीं अशा निष्कर्षाप्रत स्वामीजी पोचले. कारण एकूण दक्षिणात्य सारस्वतांच्या लोकसंख्येमध्यें या तीन मठांच्या अनुयायांची संख्या फार मोठी होती. या तीन मठांमध्ये वैचारिक एकवाक्यता घडवून आणण्याच्या दृष्टीने प्रथम श्रीइंदिराकांत तीर्थांनी काशी मठाधीश श्रीसुकृतिंद्रतीर्थ स्वामीजींशी संवाद सुरु केला. शके १८६० मध्यें मंगळूर येथे उभय मठांच्या आचार्यांची पौष अमावास्येच्या दिवशीं उत्कट भेट झाली. पहिल्या भेटीतच एकतेवर शिक्कामोर्तब होऊन या प्रयत्नांत कैवल्य मठाधीशांनाहि सहभागी करण्याबाबत उभयतांचें मतैक्य झालें.

मंगळूर मुक्कामांत उभय मठांच्या स्वामींनी एकमेकांच्या मठांना औपचारिक भेटी दिल्या आणि दोन्ही

मठांच्या अनुयायांनी उभय स्वामींचे भव्य सत्कारहि घडवून आणले. दुसऱ्याच वर्षी श्रीसुकृतिंद्रतीर्थांनी रामनवमीच्या उत्सवानिमित्त पर्तगाळी मठांत मुक्काम केला आणि त्या भेटींत उभय वैष्णव संप्रदायिक मठांमधील किल्मिषें दूर होऊन एक स्नेहकरारहि संमत झाला.

### अन्य जातींचा आदर

श्रीमद् इंदिराकांततीर्थ स्वामींच्या न्यायप्रिय आणि कनवाळू स्वभावामुळें सारस्वत समाजांतीलच नव्हे तर इतर समाजांतील लोकांचीहि त्यांच्यावर भक्ति होती. 'वसुधैव कुटुंम्बकम्' ही वृत्ति स्वामीजीनी अंगी बाणवली होती. त्यामुळे सर्वांनाच ते आपलेसे वाटत. सारस्वतांप्रमाणेच इतर अनेक जातींतील लोक त्यांच्या मार्गदर्शनासाठीं व सल्ल्यासाठीं येत. आर्थिक आणि इतर प्रकारच्या कामांसाठीं तर कधी फक्त दर्शनासाठीं येत असत. आणि स्वामीजींची हसरी, दयाळू मूर्ति पाहून धन्य होऊन जात. काणकोण तालुक्यांतील सर्व जमातींची त्यांच्यावर भक्ति होती.

श्रीइंदिराकांततीर्थ स्वामी म्हणजे मूर्तिमंत क्षमा. तसाच कांहीं अपराध कुणी केला तर त्यांना राग येई. पण बहुतेक अपराधांकडे ते क्षमाशील वृत्तीने पाहत असत. माशेल येथील एक गृहस्थ श्री. फोंडूशास्त्री करंडे हे विद्वान तसेच सुधारक वृत्तीचे होते. ते एक खंदे लेखक तसेच उत्तम कवि होते. समाजांत सुधारणा घडून यावी यासाठीं ते पोट तिडकीने लिहीत. सारस्वतांचीं धर्मपीठें या सुधारणा आड येतात असा त्यांचा समज झाला म्हणून सर्व धर्मपीठाधीशांना उद्देशून त्यांनी एक टीका काव्य लिहून तें आपल्या 'सत्संग' मासिकांतून प्रसिद्ध केलें. त्या काव्यांत सुधारणांच्या आड येत असल्याबद्दल पीठाधीशांवर टीका होती. समाजांतील मान्यवरांच्या हातांत हें मासिक पडतांच ते खवळून गेले. गोव्यातीलच नव्हे तर गोव्याबाहेरील समाजहि बहिष्कार घालण्याची भाषा बोलूं लागला. सर्वत्र खळबळ माजली. परंतु श्रीइंदिराकांततीर्थ स्वामींनी मात्र त्यांच्याकडे क्षमाशील वृत्तीनेच पाहिलें व मासिकाची वर्गणी पाठवून दिली.

### गव्हर्नर जनरलांची श्रीमठास भेट

श्रीमद् इंदिराकांततीर्थांच्या प्रदीर्घ कारकिर्दीच्या कालावधींत घडलेल्या अनेक कटु-मधुर आठवणी आजहि लोक सांगताना आढळतात. एक आठवण म्हणजे त्यांच्या अव्यक्त व्यक्तिमत्वाच्या विशिष्ट पैलूंचें दर्शनच होय. कांहीं आठवणीनी आख्यायिकांचें रूप धारण केलेलें आहेच, तर कांहीं आठवणीमध्यें त्यांच्या मनाचा हळवेपणा, अडचणीत आलेल्या माणसाबद्दल वाटणारा कळवळा, यांचे दर्शन घडतें. न्यायनीतीचें रक्षण करण्यासाठीं लोण्यासारख्या मऊ हृदयाचे हे आचार्य वज्राप्रमाणे कठीण होऊन सात्त्विक संताप व्यक्तहि करीत. दुःखद क्षणींहि विनोदी वृत्तीला फांटा देण्यास ते नकार देत. या सर्व आठवणींचें संकलन होणे आवश्यक आहे.

कांहीं आठवणी या ठिकाणी उद्धृत केल्याशिवाय चरित्रनायकाच्या व्यक्तिमत्वाची संपूर्ण कल्पना वाचकांना येणार नाहीं.

पोर्तुगालमध्ये प्रजासत्ताक आलें आणि राज्यकर्त्यांमध्ये धार्मिक सहिष्णुता प्रथम पहायला मिळाली. त्या काळांत श्री कौसैरु द कॉश्त नावाचे एक गव्हर्नर जनरल नव्यानेच नियुक्त झाले होते. हिंदु धर्माबद्दल त्यांच्या मनात आदराप्रमाणेच कुतुहलहि होतें. पर्तगाळीच्या मठांत श्रीमद् इंदिराकांततीर्थ नावाचे एक तपस्वी संन्यासी राहतात ही गोष्ट त्यांच्या कानावर गेली. स्वामीजींच्या दर्शनाची त्यांना उत्सुकता लागून राहिली. गव्हर्नर जनरलांनी आमंत्रणा शिवाय स्वामीजींच्या भेटीसाठी जाणे म्हणजे शिष्टाचाराचा भंग करण्यासारखें होईल. शिवाय आपल्या प्रथा-परंपरांचें पालन करणारे स्वामी गृहस्थांप्रमाणे गव्हर्नर जनरलांचें अदबीने स्वागत करणार नाहीत, अशा परिस्थितींत गव्हर्नर जनरलांनी स्वामीजींची भेट घेऊं नये असा सल्ला अधिकारी वर्गाने दिला.

शिष्टाचार न मोडतां स्वामीजींचें दर्शन घडावें अशा ध्यासा पोटीं गव्हर्नर जनरलांनी तिऱ्हाईतांमार्फत स्वामीजींना सूचक संदेश पाठविले. स्वामीजींकडून अधिकृत आमंत्रण आल्यास गव्हर्नर जनरल आनंदाने श्रीमठाला भेट देतील असा तो संदेश होता. पण या संदेशाकडे श्रीमद् इंदिराकांततीर्थांनी दुर्लक्षच केलें.

दुसरीकडे दररोज स्वामीजींची कीर्ति गव्हर्नर जनरलांच्या कानावर पडतच होती. अखेर त्यांनी धर्म-सत्तेपुढे लीन होण्याचा निर्णय घेऊन आपणच एखाद्या अनुकूल दिवशीं पर्तगाळी मठाला भेट देऊन श्रीस्वामी-जींचे दर्शन घेऊं इच्छित असल्याचा अधिकृत संदेश गव्हर्नर जनरलांनी पाठविला आणि श्रीइंदिराकांततीर्थांनी दिवस निश्चित करून सकाळीं अकरा वाजण्याची वेळ आपणास अनुकूल असल्याचें कळविलें.

ठरल्या दिवशीं ठीक अकरा वाजतां आपल्या लवा-जम्यासह गव्हर्नर जनरल मठाच्या प्राकारांत दाखल झाले. त्यावेळीं श्रीरामदेवाच्या मंदिरांत पूजा संपून आरत्या सुरू झाल्या होत्या. मंगल वाद्यें व मंदिरांतील घंटा वाजत होत्या. सुस्पष्ट व लयपूर्ण वेदघोष चालू होते. गव्हर्नर जनरल दूर उभे राहून हें दृष्य पहात होते. इतर भक्तांप्रमाणेच तेहि हात जोडून उभे राहिले.

आरत्या संपल्या व श्री स्वामीजी मंदिराच्या मुख्य दारांतून बाहेर आले. ते चौकांत पोचतांच गव्हर्नर जनरल स्वामीजींची तेजःपुंज मूर्ति पाहून विस्मित झाले. विनम्र-तेने त्यानी श्रीपादांसमोर गुढघे टेकून प्रणिपात केला आणि नंतर इतर भक्तांप्रमाणे हात जोडून बाजूला उभे राहिले.

दुभाषामार्फत स्वामिजींनी गव्हर्नर जनरलांशीं थोडाफार संवाद केला. स्वामीजींची विद्वत्ता व धर्म, अध्यात्म यांचें सखोल ज्ञान व त्यांचा वैज्ञानिक दृष्टीकोन आणि एखादा विषय समजावण्याची त्यांची हातोटी पाहून गव्हर्नर जनरल केवळ चकित झाले नाहींत तर श्री स्वामीजींचे भक्तहि बनले.

निरोप घेताना गव्हर्नर म्हणाले, "माझ्याकडून आपली व श्रीमठाची कोणतीहि सेवा होण्यासारखी असेल तर मी कृतार्थ होईन. पण तत्काळ या मठवास्तूजवळ आपल्या संरक्षणासाठीं आपल्या अनुमतीने एक पोलीस चौकी ठेवीन."

श्रीस्वामीजींनी तोंडावर मंदस्मित आणलें व शांत शब्दांत गव्हर्नर जनरलना सांगितलें, "या मठांत श्रीराम-देवाची अधिसत्ता चालते. जोंवर श्रीरामदेवाची इच्छा असेल तोंवर पोलिस पहारा नसतानाहि आम्ही व या मठांतील मालमत्ता सुरक्षित राहील आणि नको असेल तर आपलीं सारीं सुरक्षादलें एकत्र आलीं तरी तीं देवाच्या इच्छेसमोर निष्प्रभ ठरतील. शिवाय, सर्वसंग-परित्याग केलेल्या संन्याशाला पोलिसांनी रक्षण द्यावें ही कल्पनाच हास्यास्पद आहे."

उत्तर ऐकून गव्हर्नर जनरल स्तिमित झाले.

निरोप घेताना श्रीइंदिराकांततीर्थांनी गव्हर्नर जनरलना चंदनाची पेटी व चांदीची एक लेखणी स्मृतिभेट म्हणून दिली.

भेटीचा स्वीकार करताना गव्हर्नर म्हणाले, "मी आपल्या आज्ञेची प्रतिक्षा करीन."

"आज्ञा नव्हे, अपेक्षा आहे." श्रीस्वामीजी चट्कन उद्गारले. "मठातर्फे मिळालेल्या लेखणीचा लोकहित रक्षणासाठीं सदुपयोग व्हावा."

"अवश्य." असें आश्वासन देऊन गव्हर्नर जनरलांनी पुन्हा गुढघे टेकले.

## मुलांवरील अकृत्रिम प्रेम

मुलांवर प्रेम करणें हें महात्म्याचे लक्षण म्हणायला पाहिजे. मुलें दिसलीं कीं श्रीइंदिराकांततीर्थ मुलांपेक्षांहि लहान होऊन जात. त्यांना मुलांचा निरागस, निष्कपट स्वभाव फार आवडायचा. देवाचेंच रूप कदाचित त्यांना मुलांत दिसत असावे. मुलें हीं देवा सारखीच असतात-निर्व्याज, निष्कपट. स्वामीजी कोणत्याहि कामांत कितीहि व्यग्र असले किंवा एखाद्या विचाराचा पगडा त्यांच्या मनावर असल्याने ते चिंतित असले तरी मुलें पाहिलीं कीं ते सारे कांहीं विसरत. त्याना जवळ बोलवीत. बोलतें चालतें मूल असलें तर त्याला त्याचें नांव विचारीत. त्याने बोबड्या बोलांतून उत्तर दिलें की आनंदित होत आणि जवळच ठेवलेल्या भांड्यांत हात घालून खारीक, खडीसाखर किंवा जें काय असेल तें त्या मुलाच्या हातावर ठेवीत. मुलेहि आनंदित होऊन देवा इतक्याच भक्तिभावाने स्वामीजींना नमस्कार करीत. आपला दुपारचा वेळ खर्चून स्वामीजी कागदाचे लहान लहान तुकडे करून त्यांत एक दोन चमचे साखर घालून त्यांच्या पुड्या बांधून ठेवीत, मुलें भेटीला येतील त्यावेळीं त्यांच्या हातावर ठेवण्यासाठीं. खरोखर मुलांवर जो माया करतो तो थोरांहूनहि थोर असतो, हेंच खरें.

वन्य प्राण्यावरहि त्यांचें असेच प्रेम. चितळ, साळ, कृष्णमृग यांसारखे प्राणीहि त्यांनी पाळले होते. रोज संध्याकाळी वृंदावनस्थ गुरूंना नमस्कार करून आल्यावर

स्वामीजी कृष्णमृगाला हाक मारीत. वास्तविक त्याला हाक मारायची गरजच नसायची. रोजच्या संवयीप्रमाणें ठरल्या वेळीं तें स्वामीजींच्या मागे मागेच असे. तें जवळ आलें की स्वामीजी मूठ दोन मूठ वाटाणे किंवा हरभरे त्याच्यापुढें पसरून देत. कृष्णमृग तोंडाने ते दाणे टपटप वेचून खात असे आणि स्वामीजी कौतुकाने त्याच्याकडे पहात.

कबुतरांसाठी तर त्यांनी एक स्वतंत्र स्तंभच उभारला होता आणि त्या स्तंभावर फळयांचे कप्पे केले होते. ते कप्पे म्हणजे कबुतरांची घरें. स्वामीजी दररोज दुपारीं आपल्या हाताने त्यांना अन्न देत. त्यावेळीं कबुतरांची मौज बघण्यासारखी असे. गोठ्यांत तर गाईवासरें अगणित असत. त्यांच्या देखभालीवर स्वामीजींची करडी नजर असे. ते स्वतः अधूनमधून गोठ्यांत जाऊन गायीवासराना पाहून येत. आणि स्वामीजी गोठ्यांत आल्यानंतर गुरेहि प्रेमाने हंबरत.

### ग्रंथसंपदा

स्वामीजी विद्वान होते, बुद्धिमान होते, वाक्चतुर होते तसेच उत्तम प्रवचनकार आणि अध्यापकहि होते. धर्म परायण तसेच प्रेमळ गुरू होते, तसेच ते ग्रंथकारहि होते. पीठाधिकार स्वीकारानंतर नवव्या वर्षीच त्यांनी गीतेवर भाष्य लिहिलें. आजपर्यंत गीतेवर अनेक विद्वानांनी अनेक ग्रंथ लिहिले. वेगवेगळया विद्वानांनी गीतेचा वेगवेगळया प्रकारे अन्वयार्थ लावला आहे. अद्वैत हा गीतेचा सिद्धांत असे सांगितलें जातें. परंतु श्रीइंदिराकांततीर्थ स्वामींनी श्रीमन्मध्वाचार्यांच्या द्वैत सिद्धांतानुसार गीतेवर भाष्य लिहिलें. धर्म व अध्यात्मांतीलच केवळ नव्हे तर साहित्यांतीलहि हें त्यांचें मोठें कार्य आहे. या ग्रंथाची तिसरी आवृती श्रीमद्द्वारकानाथतीर्थ यांनी प्रसिद्ध केली. गीताभाष्याशिवाय गीता गौरव, न्याय, मीमांसा, द्वैत बोधिनी आदि ग्रंथ त्यांनी लिहिले. सागर रामाचार्य लिखित सुनीति भागवतावर स्वामीजींनी टीकाहि लिहिली. एवढा सारा व्याप सांभाळून एवढी ग्रंथरचना करणारे आचार्य विरळच!

### महानिर्वाण

तपस्वी साधकाने आपले अवतारकार्य संपविण्याचें ठरवून इहलोकांतील व्यापाची आवराआवर करावी तशा पद्धतीने श्रीमद् इंदिराकांततीर्थांनी आपल्या महानिर्वाणाची पूर्वतयारी शके १८६४चे संवत्सर सुरु होतांच चालविली. प्रिय शिष्य श्रीमद् कमलानाथतीर्थांना समाज व मठापुढील कार्याची, प्रश्नांची व ते प्रश्न हाताळण्यासाठीं आपण घेतलेल्या दिशेची पुन्हा एकदां स्पष्ट कल्पना दिली आणि बदलत्या युगांत होणाऱ्या स्थित्यंतराकडे लक्ष ठेवून मठ परंपरेला आंच येऊं न देतां समाजाच्या प्रगतीचे मार्ग खुले करण्याचा कानमंत्र दिला. आणखी एक सूचनाहि केली. पाठशाळेंतील विद्यार्थ्यांमध्ये गोविंद नामक एक विद्यार्थी होता. शिष्य म्हणून त्याचा स्वीकार करण्याच्या दृष्टीने विचार व्हावा असे त्यांनी शिष्यस्वामीना सांगितलें.

वार्षिक श्रीरामनवमी हा मुख्य उत्सव. त्या उत्सवाला हजेरी लावण्यासाठीं श्रीस्वामीजी मुद्दाम दोन दिवस आधीं पर्तगाळी मठांत परतले. आपल्या कारकिर्दितील तो शेवटचा रामनवमी उत्सव असल्याची जाणीव स्वामीजींना असावी. प्रत्येक गोष्ट स्वतः करीत. श्रीरामनवमीचा तो उत्सव म्हणजे अधिकाधिक लोकांचा निरोप घेण्याचा प्रसंग ठरला.

श्रीरामनवमी उत्सव भव्यतेने साजरा झाला आणि दूरवरचे लोक परतले. श्रीइंदिराकांत तीर्थांची आवरावर चालूच होती. चैत्र वद्य पंचमीला श्रीमठांत नाटकाचा प्रयोग झाला. शिष्यस्वामीसह तें नाटक पहायला, ते थोडा वेळ बसले. किंचित अस्वस्थ वाटल्यामुळें ते अर्ध्यावर उठले. त्यावेळीं श्री स्वामीजींच्या अंगांत सडकून ताप भरला होता.

दुसरा दिवस उजाडला. त्यावेळीं जसें काय आदल्या दिवशीं कांहींच घडलें नाहीं असें सर्वांना वाटावे इतकी त्यांची प्रकृति उत्तम होती. संध्याकाळ पर्यंत प्राणज्योत मंदावत चालली आणि सप्तमीच्या मध्यरात्रीं ती मालवली.

एक दिव्य शक्ति या जगतांतून अंतर्धान पावल्याचा भास शिष्य परिवाराला झाला... पण त्या प्राणज्योतीचे तेज आजहि श्रीमठाच्या कार्यांत जाणवतें आणि समाजाला अजूनहि त्या निम्म्या शतकाच्या कारकिर्दीपासून प्रेरणा मिळत असते.

# घटनाक्रम

| | |
|---|---|
| शके १७९३ माघ शु. ७मी गुरुवार, | भटकळ येथें जन्म. मूळ नांव : रामकृष्ण. माता : सौ. लक्ष्मी. पिता : नरसिंह पुराणिक गोत्र : भारद्वाज. |
| शके १८०८ वैशाख शु. १०मी गुरुवार, दि. १३-५-१८८६ | पर्तगाळ मठांत एकोणिसावे पीठाधीश श्रीपद्मनाभतीर्थ यांजकडून संन्यास दीक्षा. श्रीइंदिराकान्ततीर्थ नामाभिधान |
| शके १८१४ आषाढ शु. ७मी शुक्रवार, दि. २-७-१८९२ | गुरुवर्य श्रीपद्मनाभतीर्थ वृंदावनस्थ |
| शके १८१४ आषाढ व. तृतीया मंगळवार दि. १३-७-१८९२ | श्रीगुरुपीठारोहण |
| शके १८१४ मार्गशीर्ष शु. १० मी | पहिल्या दिग्विजयाचा आरंभ, कडवाड, अंकोला,कोडकणी,कुमठा, हळदीपूर होन्नावर, मुर्डेश्वर, भटकळ, शिरूर व व्यंकटापूर |
| शके १८१५ मार्गशीर्ष शु. १३ शी | दुसऱ्या दिग्विजयाचा आरंभ : खोल, मडगांव, वेलिंग, मंगेशी, मडकई, कुंडई, जुवारी, माशेल, सावईवेरें सांखळी, डिचोली, म्हापसें, शिवोली, रेडी, वेंगुर्ले, हाडोवडें, कुडाळ, मालवण, धामापूर, हरमल, वेरें, नेरुल, पणजी, रायबंदर, कुंभारजुवें, पारोडे, बाळ्ळी, काणकोण. |
| शके १८१७ कार्तिक शु. चतुर्थी | तिसरा दिग्विजय सुरूः पैंगीण, लोलयें, सुंकेरी, अंकोला, गोकर्ण, यल्लापूर, सिर्सी, सिद्धापूर, कुमठा, कोडकणी, होनावर, कुंदापुर, बसरूर, ब्रह्मावर, बारकूर, उडुपी, कल्याणपूर, मंगळूर, कासरगोड, होसदुर्ग, बेडगिरी, कालिकत, त्रिचनापल्ली, मीनाक्षी, रामपूर, रामेश्वर, विष्णुकांची, शिवकांची, गोविंदराजपट्टण, तिरुपती, गुंटकल, हुबळी, लोंढा, मडगांव, मुरगांव, पणजी, कांदोळी, कळंगुट, शिवोली, वेरें, कालापूर, थोरलें गोवें, कुंकळ्ळी. |
| शके १८१८ वैशाख शु. १५ मा | चिक्कनकोड येथील श्री. नारायण आचार्य यांचे सुपुत्र व्यासराय यांना गोकर्ण येथील मठीं संन्यास दीक्षा देऊन शिष्य म्हणून स्वीकार झाला व बटूस श्रीनरहरीतीर्थ असें नामाभिधान देण्यांत आलें. |
| शके १८१९ मार्गशीर्ष कृष्ण षष्टी | श्रीनरहरीतीर्थांचें निर्वाण |
| शके १८२० ज्येष्ठ वद्य २या | चौथा दिग्विजय सुरूः लोलयें, कारवार, सुंकेरी, चेंडिये, अंकोला, हळगें, हेगडें, कुमठा, होनावर, कासरकोड, मुर्डेश्वर, शिराळी. |
| शके १८२१ मार्गशीर्ष ५ मी | पांचवा दिग्विजयः उत्तर व दक्षिण कर्नाटक |

| | |
|---|---|
| शके १८२२ आषाढ शु. ९मी | सहावा दिग्विजयः बाळ्ळी, कुंकळी, मडगांव,रायतूर, माशेल, कुंडई, सांखळी, डिचोली, अस्नोडें, शिवोली, हरमल, केरी, रेडी, शिरोडें, वेंगुर्ले, कुडाळ, धामापूर, मालवण, कणकवली, फोंडाघाट, कोल्हापूर, नृसिंहवाडी, पुणें, पंढरपूर, म्हापसें, कुंडई, म्हाडदोळ, वेलींग, सावईवेरें, शिरोडें, पंचवाडी, काकोडें, रिवण. |
| | काशी येथील अन्नछत्र प्रकरणीं पत्रव्यवहार. |
| | श्रीगोपाळकृष्ण मठ भाविनकुर्वे येथें संस्कृत आर्य विद्याशाळेचें उद्घाटन. |
| शके १८२३ आश्विन शु. १४ शी | सातवा दिग्विजय : कारवार, सुंकेरी, अवर्से, अंकोला, गोकर्ण मादनकेरी, कुमठा, होनावर, माविनकुर्वे, बारकूर, इडगुंजी, होसाड, गेरसप्पा, सिद्धापूर, वेंकटापूर, शिराळी, मुर्डेश्वर, कासरकोड, हळदीपूर, तिळगी, कडवाड, सदाशिवगड |
| वैशाख शु. ७ मी | बारदेशकर प्रकरणाचा निकाल. मुलींच्या विवाह-वयाचें बंधन शिथिल. |
| शके १८२४ मार्गशीर्ष शु ९ मी | आठवा दिग्विजयः सदाशिवगड, हळगें, लोंढा, बेळगांव, खानापूर, हल्याळ, यल्लापूर, अंकोला, कडवाड. |
| शके १८२५ वैशाख शु. ९ मी | नववा दिग्विजय : गोकर्ण, शिरूर, अंकोला, कुमठा, उप्पीनपट्टण, होनावर, मुर्डेश्वर, वेंकटापूर, शिराळी, कासरकोड, गंगोळी, कुंदापूर, बसरूर, सोमेश्वर, सिद्धापूर माविनकुर्वे, हळदीपूर, कागल, मादनकेरी, गोकर्ण, चेंडियें, कारवार, |
| शके १८२६ मार्गशीर्ष व. १ दा | दहावा दिग्विजयः बाळ्ळी, कुंकळी, असोळणें, तळवडें, पारोडें, रामनाथी, वेलिंग, केरी, म्हाडदोळ, कुंडई, पानवेल, मडकई, प्रियोळ, डोंगरी, काकोडें, जांबावली, रिवण. |
| शके १८२७ ज्येष्ठ शु. ५ मी | अकरावा दिग्विजय : डिचोली, कुंभारजुवें, रामनाथी, गोठण, सांखळी, अस्नोडें, थिवी, शिवोली, हरमल, केरी, शिरोडें, आखली, आजगांव, रेडी, कोचरें, मालवण कणकवली, राजापूर, पाली, लांजे, संगमेश्वर, चिपळूण, रत्नागिरी, पुळें-गणपती, बांबर्डे, वेंगुर्ले, शिरोडें, आरवली, म्हापसें, रायबंदर, कुंडई, म्हाडदोळ, गोठण, पारोडें, बाळ्ळी, फातर्पे, खोल, आगोंद. |
| शके १८२७ गुरुवार, ज्येष्ठ शु. १३ शी | डिचोली मठाचें उद्घाटन व श्रीदेव प्रतिष्ठापना. परदेश गमन प्रकरणावर तोडगा, डिचोली मठांत संस्कृत पाठशाला सुरू |
| शके १८२८ | श्रीमद् भगवद्गीता मराठी अनुवादाचें प्रकाशन |
| शके १८२९ वैशाख वद्य ५ मी | श्री वैकुंठ नारायण आचार्य (पर्तगाळी) यांचे सुपुत्र नारायण यांस संन्यास दीक्षा - आश्रमीय नांव श्रीकमलानाथतीर्थ. |

| | |
|---|---|
| शके १८२९ | बारावा दिग्विजयः बाळ्ळी, पारोडें, म्हार्दोळ, वेलिंग, सावर्डे, बेळगांव, शहापूर, पुणें, मुंबई, अजमेर, मथुरा, वृंदावन, गोकुळ, हरिद्वार, बिल्वकेदार, ह्रषिकेश, प्रयाग,काशी, गया, अयोध्या. |
| शके १८३१ कार्तिक वद्य ११ शी | तेरावा दिग्विजयः रिवण, शहापूर, सांवर्डे, बेळगांव, हंपी, विरुपाक्ष, विजयनगर, द्रोणाचलम, बेझवाडा, मंगलापूर, काकीनाडा, वाल्टेर, जगन्नाथपुरी, साक्षीगोपाळ, भुवनेश्वरी, वैतरणीतट, रामटेक, भुसावळ, नर्मदातट, ओंकारेश्वर, उज्जयिनी, क्षिप्राकांठ, ग्वाल्हेर, गोमतीकांठ, डाकोर, गिरनार, सोमनाथपट्टण, पोरबंदर, द्वारका, मुंबई, पुणें, लोंढा, मडगांव. |
| शके १८३२ वैशाख शु. १४ शी | चौदावा दिग्विजयः कारवार, अंकोला, हळदीपूर, होनावर, करिकुर्वे, बळकूर, मुर्डेश्वर, शिरुर, वेंकटापूर, भटकळ, बैंदूर, बसरूर, कोटेश्वर, बारकूर, कल्याणपूर, उडुपी, मुल्की,गुरुपूर, मुडबिद्री, कारकळ, बेळतंगडी, बंटवाळ, उल्लाठ, होसदुर्ग |
| शके १८३२ माघ शु. १ दा | उडुपी येथें मध्व संप्रदायाच्या मठाधीशांशीं भेट- एकीबेकी प्रकरणाचा निकाल |
| शके १८३२ भाद्रपद व. १२ शी | पंधरावा दिग्विजय : रिवण, सांवर्डे, लोंढा, हुबळी, गुंटकळ पद्माव-तीपट्टण, तिरुपती, कालहस्ती, रेनीगुंठा, सुब्रह्मणेश्वर, घटिकाचल, चंगलपेठ, चिदंबर, तोताद्री, अनंतरायन, मातुलिंग अल्लेपी, कोच्चि, तिरुमल, बेंगळूर |
| शके १८३४ निजाषाढ शु ५ मी | सोळावा दिग्विजयः दक्षिण व उत्तर कर्नाटक |
| शके १८३५ चैत्र व. ८ मीः | सतरावा दिग्विजयः नाशिक झांशी, दिल्ली, हरिद्वार, ह्रषिकेश, प्रयाग, काशी, गया, बिल्वकेदार, श्रीनगर, रुद्रप्रयाग,पाताळगंगा, बदरि-काश्रम, नंदप्रयाग, मुरादाबाद, आग्रा, ग्वाल्हेर, मुंबई, पुणे. |
| शके १८३७ आश्विन कृ १० | अठरावा दिग्विजयः बाळ्ळी, मडगांव, पारोडें, रिवण, काकोडें, पंचवाडी, माशेल, डिचोली, दोडामार्ग, शिरोडा, रेडी, आखंदे, वेलिंग, सांवर्डे, हुबळी, विजयनगर, गुंटकल, गोविंदराजपट्टण, तिरुपती, विष्णुकांची, शिवकांची, श्रीरंगम्, मदुराई-मीनाक्षी, रामेश्वर, दर्भशयन, होसदुर्ग, विठ्ठलक्षेत्र, पाणीमंगळूर, उल्लाळ, बेंगळूर, लोंढा. |
| शके १८४१ आश्विन शु. १४ श्री | एकोणिसावा दिग्विजयः अस्नोटी, सुंकेरी कडवाड, हळगें, अवर्से, अंकोला, कारवार, |
| शके १८४२ | शिर्सी येथें सुब्रह्मण्य वेद पाठशाळेची स्थापना. |
| शके १८४४ वैशाख व १ दा | विसावा दिग्विजय : कारवार, अंकोला, कुमठें, हळदीपूर, होनावर, माविनकुर्वे, कासरकोड, होसाड, वेंकटापूर, भटकळ, मुर्डेश्वर, मंकी, कासरकोड, उप्पीनपट्टण, कोडकणी, हेगडें, कागल, मादनकेरी. श्रीसुनीति भागवताचें प्रकाशन |

| | |
|---|---|
| शके १८४५ वैशाख शु.७ मी | एकविसावा दिग्विजयः कारवार, अंकोला, कुमठा, इ. उत्तर कर्नाटका नंतर सादोळशें, पारणें, आगोंद, खोल, असोळणें, कुंकळी, रिवण, काकोडें, पंचवाडी, दुर्भाट, रामनाथीं, बांदिवडें, मडकई, कुंडई, म्हाडदोळ, गोठण, प्रियोळ, कुंकळयें, डोंगरी, माशेल, डिचोली, शिवोली, म्हापसें, कुंभारजुवें, पानवेल, रायबंदर, थोरलें गोवें, कुठ्ठाळ, बाळ्ळी. |
| १७ डिसेंबर १९१२ | लोलयें येथील शिक्षण संस्था उभारण्याचा आदेश |
| चैत्र शु. १ दा | होनावर येथें पाठशाळेची स्थापना. |
| शके १८५० आषाढ शु १२ शी | बाविसावा दिग्विजयः लोलयें, कारवार, सुंकेरी, कडवाड, बिणगें, चेंडियें, अंकोला, होनावर, कासरकोड, वेंकटापुर, कुमठा, कोडीबाग, |
| शके १८५१<br>आश्विन व ८ मी | तेविसावा दिग्विजयः लोलयें, कारवार, हळगें, अंकोला, मादनकेरी, उप्पिनपट्टण, निलकुंद, सिद्धापूर, बिळगी,गेरसप्पा, कासरकोड, वेंकटापूर, भटकळ, होनावर, हेगडें, |
| शके १८६० पौष शु. ४ थी | चोविसावा दिग्विजयः म्हाडदोळ, वेलिंग, गोठण, मडगांव, लोंढा, हरिहर, बसरूर, मंगळूर, उडुपी, मुल्की बंटवाळ, उप्पीन गुंडी, कडूर, बेळगांव, मडगांव, जांबावली, रिवण, कुंकळ्ळी, |
| माघ शु. २ या | गोकर्ण-काशी मठाधीशांचें संमेलन |
| माघ व १० मी | उडुपी येथें मध्वसंप्रदायी पीठाधीशांच्या संमेलनांत सहभाग |
| शके १८६१ चैत्र ९ मी | काशी मठाधीश श्रीसुकृतींद्रतीर्थ स्वामींचे पर्तगाळी मठांत आगमन व उभय मठांमध्यें स्नेहवृद्धी. |
| वैशाख ६ मे १९३९ | करारपत्र |
| शके १८६३ वैशाख ४ थी. | पंचविसावा दिग्विजयः रिवण, जांबावली, डिचोली, सांखळी, गोठण, वेलिंग, म्हाडदोळ, कांदोळी, डोंगरी, रामनाथी, बांदिवडें, कालापूर, शिर्दोन, पणजी, ताळगांव, कुंभारजुवें, माशेल, कुंडई, मडकई, म्हापसें, हळदोणें, शिवोली, सावईवेरे, बेळगांव, शाहापूर, बैलहोंगल. |
| शके १८६४ चैत्र कृष्ण ७ मी<br>मंगळवार, दि. २६-४-१९४२. | महानिर्वाण |



# श्रीइंदिराकांततीर्थ स्वामीजींच्या कारकिर्दीतील जीर्णोद्धार, देव-प्रतिष्ठा, यात्रा वगैरे

| क्र | खि. शक | तपशील |
|---|---|---|
| १. | १९०१ | यज्ञमंटप, पूर्वगुरुवर्यांच्या वृंदावनशाला निर्माण. |
| २. | | सिद्धापूर - वेंकटरमण देवालयाचा जीर्णोद्धार. |
| ३. | | म्हापसा - श्रीलक्ष्मीनारायण मंदिर उभारणेस प्रेरणा व सहाय्य. |
| ४. | | श्रीशांतादुर्गा - गोठण देवालयाचा घूड नवीन बांधून घेतला. |
| ५. | | बदरीनाथ यात्रा. |
| ६. | | काशीयात्रा. |
| ७. | | अयोध्या, मथुरा, ऋषिकेश यात्रा. |
| ८. | | रामेश्वर यात्रा - प्रथम शिष्यासह. |
| ९. | | रामेश्वर यात्रा - शिष्य कमलानाथांसह. |
| १०. | | द्वारका व जगन्नाथपुरी यात्रा. |
| ११. | | वेंकटापूर देवस्थान जीर्णोद्धार व प्रतिष्ठा. |
| १२. | १९०३ | भटकळ - वडेर मठाच्या गर्भ मंदिराचें नूतनीकरण. |
| १३. | १९०५ | दिवचल गांवांत मठवास्तू उभारून देव-प्रतिष्ठा. |
| १४. | १९११ | मंगळूर येथील गोकर्ण मठाच्या समोर एक मजली वास्तु - उभारणी |
| १५. | १९१९ | हळगा - श्रीमठ वास्तु उभारण्यांत सहाय्य. |
| १६. | | शेळी - श्री गोपालकृष्ण देवस्थानांत प्रतिष्ठा |
| १७. | १९२२ | होन्नावर गांवांतील श्रीवेंकटरमण देवस्थान श्री संस्थानी हस्तांतर करून घेतलें. |
| १८. | | कारवार मठ-स्थापना. |
| १९. | १९२४ | पर्तगाळ मठीं श्री वीरविठ्ठल देवाच्या समोरील वासरी, खालील वासरी आणि नैवेद्याच्या स्वयंपाकगृहाचें नूतनीकरण |
| २०. | १९३४ | श्रीरामदेवा समोरील मोठी माडी व खालील चावडीसह संपूर्ण बांधकाम. |
| २१. | १९३५ | अंकोला गोकर्ण मठाचा जीर्णोद्धार |
| २२. | | पर्तगाळी मठांत शिक्षण घेत असलेल्या सेनापूर आचार्य घराण्यांतील गोविंदाचार्य यास प्रशिष्य म्हणून निवड करून मठ परंपरेबद्दल असलेले प्रेम व अभिमान तसेंच दूरदर्शित्व प्रकट केलें. व आपल्या वृंदावनोत्तर शिष्य लवकर स्वीकार करणेचा आदेशहि आपले प्रिय शिष्य श्रीमत्कमलानाथ तीर्थ स्वामींना दिला. |
| २३. | | शेतजमीन, गझन जवळ ५०० एकर |
| २४. | १९३६ | बसरूर मठाच्या समोर एकमजली वास्तु उभारणी. |

